20110420145607001

<u>सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका</u>
महानगरपालिका क्षेत्रातील सर्वंकष परिवहन योजना अभ्यास करण्याकरीता सल्लागाराची फी अदा करण्यासाठी कर्ज उभारण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- सामपा ३०१०/प्र.क्र.७९/नवि-२२**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक- ३१ मार्च,२०११.**

संदर्भ: आयुक्त, सांगली,मिरज,कुपवाड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्रमांक- मनपा/सा.बा.वि./६३९/२०१०-११, दिनांक २९/११/२०१०.

**प्रस्तावना :-**

सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका क्षेत्रातील प्रवासी वाहतुक जलद, सुलभ व सुरक्षित व्हावी, यादृष्टीने उपाययोजना करण्यासाठी सर्वंकष परिवहन योजना अभ्यास महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चरल डेव्हलपमेंट कंपनी प्रा.लि. यांचेमार्फत करण्याबाबत महानगरपालिकेच्या महासभा ठराव क्रमांक-१२७ दिनांक २१/१/२००९ अन्वये निर्णय घेण्यात आलेला आहे. सदर निर्णयानुसार सर्वंकष परिवहन योजना अभ्यास करण्यासाठी महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चरल डेव्हलपमेंट कंपनी प्रा.लि. यांच्या स्तरावर सल्लागाराची नियुक्ती करण्यास व त्यांना सल्लामसलत शुल्क रुपये ४४,२७,४४२ + १० टक्के निविदा जाहिरात खर्च अशी एकूण रुपये ४८,७०,१८४/- (अक्षरी रुपये अठ्ठेचाळीस लाख सत्तर हजार एकशे चौ-यांशी फक्त) एवढी रक्कम ५ वर्षे मुदतीने वार्षिक ६ % व्याज दराने महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चरल डेव्हलपमेंट कंपनी प्रा.लि. यांच्याकडून कर्ज घेण्यास व सर्वंकष परिवहन योजना अभ्यास अहवाल सादर केल्यानंतर सल्लामसलत शुल्काची रक्कम सल्लागारास अदा करण्यास महानगरपालिकेच्या स्थायी समिती ठराव क्रमांक- २४५, दिनांक २७/८/२०१० अन्वये मान्यता देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने सर्वंकष परिवहन योजना अभ्यास अहवाल तयार करण्यासाठी सल्लागारास शुल्क अदा करणे व सल्लागाराच्या नेमणुकीसाठी निविदा जाहिरातीवरील खर्च असे एकूण रुपये ४८,७०,१८४/- (अक्षरी रुपये

अठ्ठेचाळीस लाख सत्तर हजार एकशे चौ-यांशी फक्त) एवढया रकमेचे कर्ज महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चरल डेव्हलपमेंट कंपनी प्रा.लि. यांच्याकडून उभारण्यासाठी मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम १०९ नुसार मान्यता देण्याचा संदर्भाधिन पत्रान्वये पाठविलेला आयुक्त, सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका यांचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

आयुक्त, सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका यांच्या संदर्भाधिन पत्राच्या अनुषंगाने महानगरपालिका क्षेत्रात सर्वंकष परिवहन योजना अभ्यास करण्याकरीता सल्लागारास फी अदा करण्यासाठी रुपये ४४,२७,४४२ + १० टक्के निविदा जाहिरात खर्च अशा एकूण ४८,७०,१८४/- (अक्षरी रुपये अठ्ठेचाळीस लाख सत्तर हजार एकशे चौ-यांशी फक्त) एवढया रकमेचे कर्ज महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चरल डेव्हलपमेंट कंपनी प्रा.लि.यांच्याकडून घेण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम १०९ अन्वये व त्याखालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देत आहे.

२. महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चरल डेव्हलपमेंट कंपनी प्रा.लि. या कंपनीकडून ज्या कारणास्तव कर्ज मंजूर करण्यात येणार आहे, त्याच कारणाकरीता कर्जाचा विनियोग करण्याच्या अटीच्या अधीन राहून सदर मान्यता देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( आ.श्रा. जिवने )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चरल डेव्हलपमेंट कंपनी प्रा.लि.,मंबई.

२) आयुक्त, सांगली, मिरज,कुपवाड शहर महानगरपालिका,सांगली

३) निवड नस्ती, नवि-२२.

